उस्मानाबाद जिल्हा कारागृह येथे एल टाईप बरॅकी बांधून झालेल्या खर्चाबाबत.

महाराष्ट्र शासन,
गृह विभाग.
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,

शासन निर्णय क्र. एमआयएस-१०८७/८७[२२१]/पीआरएस-२, दिनांक : १८ जून, ९३.

वाचा :- कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. बीएलडी-६१५४७/९४०३/क-३, दि. २९.९.१९९२.

निर्णय :- उस्मानाबाद जिल्हा कारागृह येथे बांधण्यात आलेल्या "एल टाईप बरॅकींचा" उपयोग कैद्यांना ठेवण्यासाठीच करण्यात येणार आहे. म्हणून सुरक्षिततेच्या दृष्टीने बरॅकीबाहेरून तटभिंत असणे आवश्यक आहे. तटभिंत बांधण्यासाठी येणा-या खर्च रुपये ७,३६,०००/- [रुपये सात लाख छत्तीस हजार फक्त] इतक्या खर्चाच्या नकाशे व अंदाजपत्रकास शासन या आदेशाद्वारे खालील ३ अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मंजूरी देत आहे.

१] प्रस्तुत काम १९९३-९४ मध्ये हाती घ्यावयाचे असल्यास नियोजन विभागाने वेळोवेळी लावलेल्या कपातीनंतरच्या उर्वरित रकमेतून करण्यात यावे. नियोजन विभागाने मंजूर केलेल्या नियतव्ययामध्येच या कामावरील खर्च भागविणे आवश्यक राहील.

२] अर्थसंकल्पात योग्य ती तरतूद केल्या शिवाय कामास सुरवात करण्यात येऊ नये.

३] सदरहू काम नवीन स्वरूपाचे होत असल्यास विधानमंडळाच्या नजरेस आणणेसाठी आवश्यक तो प्रस्ताव शासनास सादर करावा.

२. या कामावरील खर्च "४०५९ सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च-०१-कार्यालयीन इमारती -१०१-बांधकाम-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-तुरुंग" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. हा आदेश सार्वजनिक बांधकाम विभाग, नियोजन विभाग, व वित्त विभागाच्या अनुक्रमे अनौपचारिक संदर्भ क्र. ४८/इमा-२, दि. ५.२.१९९३, क्र. ५३/यो-१०, दि. २५.२.१९९३ व क्र. सीआर-१२६/९३/व्यय-८, दि. २६.४.१९९३ अन्वये त्या विभागांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

[ अ. ल. पाटील ]
अवर सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग.